राज्य सार्वजनिक उपक्रमाच्या अंशकालीन अध्यक्ष, उपाध्यक्ष व संचालक मंडळाचे सदस्य यांना अनुज्ञेय सेवा सुविधांमध्ये सुधारणा व राज्यस्तरीय समित्या/परिषदा/आयोगाच्या अध्यक्ष आणि उपाध्यक्षांना द्यावयाच्या सेवा-सुविधा

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक : शासाउ-१०.०२/प्र.क्र.६/०३/सा.उ.

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २२ ऑगस्ट, २००३

**वाचा** :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शासाउ-१०९७/प्र.क्र.१२/९७/सा.उ. दिनांक ०१ डिसेंबर, २०००.

**प्रस्तावना** :-

राज्य सार्वजनिक उपक्रमांचे अंशकालीन अध्यक्ष, उपाध्यक्ष व संचालक मंडळाचे सदस्य यांना अनुज्ञेय सेवा-सुविधांमध्ये सुधारणा व राज्यस्तरीय समित्या/परिषदा/आयोगाच्या अध्यक्ष आणि उपाध्यक्षांना द्यावयाच्या सेवा-सुविधांमधील सुधारणा व एकसूत्रता आणण्याच्या दृष्टीने आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शासाउ-१०९७/प्र.क्र.१२/९७/सा.उ., दिनांक १.१२.२००० अन्वये निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयातील सुविधांमध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

वर उल्लेखित बाब विचारात घेऊन, शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ०१ डिसेंबर, २००० मधील आदेश अधिक्रमीत करून शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

(1) राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या अंशकालीन अध्यक्ष तसेच राज्यस्तरीय समित्या/ परिषदा/ आयोगाच्या अंशकालीन अध्यक्ष यांना सोबतच्या जोडपत्र-१ प्रमाणे सेवा सुविधा अनुज्ञेय राहतील.

(2) राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या उपाध्यक्षांना तसेच राज्यस्तरीय समित्या/ परिषदा/आयोगाच्या उपाध्यक्ष यांना सोबतच्या जोडपत्र-२ प्रमाणे सेवा सुविधा अनुज्ञेय राहतील.

(3) राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या संचालक मंडळाच्या सदस्यांना जोडपत्र-३ प्रमाणे सेवा सुविधा अनुज्ञेय राहतील.

(4) राज्य सार्वजनिक उपक्रम व राज्यस्तरीय समित्या/परिषदा/आयोग यांचे मंत्री/राज्यमंत्री दर्जा प्राप्त अध्यक्ष / उपाध्यक्ष यांना या शासन निर्णयातील तरतूदी व्यतिरीक्त इतर सुविधा असणार नाहीत. तसेच अध्यक्ष / उपाध्यक्ष असलेल्या विद्यमान मा.मंत्री/राज्यमंत्री यांना शासनाकडून ज्या सुविधा मिळतात त्या व्यतिरीक्त इतर कोणतीही सुविधा (उदा. वाहने, उपक्रमांच्या कर्मचारी वर्गाची अनौपचारीक सेवा, दालन/निवासस्थान इत्यादींच्या सजावटी, मोबाईल फोन, पेजर, प्रवासभत्ता, बैठकभत्ता इत्यादी) त्या-त्या उपक्रमांच्या निधीतून अनुज्ञेय असणार नाही.

(5) राज्यस्तरीय समित्या/परिषदा/ आयोग यांच्या सदस्यांना शासन निर्णय, क्र.मु.वि.नि. १०९५/प्र.क्र.१२/९५/विनियम, दिनांक १५ जून, १९९५ मधील तरतूदींनुसार बैठकभत्ता व वाहन खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील.

२. वरील तरतूदी हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अ. कु. दौ. जाधव)
प्रधान सचिव (वित्त)

मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, महाराष्ट्र शासन
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सचिव
अतिरीक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग (नांवाने)
सर्व राज्य शासकीय सार्वजनिक उपक्रमांचे व्यवस्थापकीय संचालक/
मुख्य कार्यकारी अधिकारी (नांवाने)
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली
वित्त विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव
वित्त विभागातील सर्व कार्यासन अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
निवड नस्ती, सार्वजनिक उपक्रम शाखा.

# शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :- शासाउ-१००२/प्र.क्र.६/०२/सा.उ., दिनांक २२ ऑगस्ट, २००३

## जोडपत्र-एक

| अनु. क्र. | राज्य सार्वजनिक उपक्रमाच्या अध्यक्षांना देय सोयी-सुविधा | | | | | राज्यस्तरीय समित्यांच्या /परिषदांच्या अध्यक्षांना देय सोयी सुविधा | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | सध्याच्या सोयी सुविधा | | प्रस्तावित सोयी-सुविधा | | | प्रस्तावित सोयी -सुविधा | | |
| | सोयी-सुविधांचे स्वरुप | शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक १८.१०.१९९१ नुसार देय सोयी-सुविधा | अंशकालीन अध्यक्ष (सर्वसाधारण) | राज्यमंत्र्यांचा दर्जा प्राप्त अंशकालीन अध्यक्ष | मंत्र्यांचा दर्जा प्राप्त अशकालीन अध्यक्ष | अध्यक्ष (सर्वसाधारण) | राज्यमंत्र्यांचा दर्जा प्राप्त अध्यक्ष | मंत्र्यांचा दर्जा प्राप्त अध्यक्ष |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | **मानधन** | दरमहा रुपये ३०००/- | रुपये ५०००/-दरमहा | रुपये ५०००/-दरमहा | रुपये ५०००/-दरमहा | रुपये ५०००/-दरमहा | रुपये ५०००/-दरमहा | रुपये ५०००/-दरमहा |
| २ | **संचालक मंडळाच्या बैठकीस उपस्थित राहण्याकरिता बैठक भत्ता** | रुपये १५०/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक |
| ३ | **निवासी दूरध्वनीवरील खर्च** | प्रतिमाह रुपये १०००/- पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती |
| ४ | **कार्यालयीन कामासाठी वाहन सुविधेवरील खर्च** | प्रतिवर्षी रुपये १८०००/- पर्यंत इंधन व तेलावरील खर्चाच्या मर्यादेत | (अ) उपक्रमाने वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ५४०००/- पर्यंत मर्यादित अनुज्ञेय राहील किंवा | (अ) उपक्रमाने वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ५४०००/- पर्यंत मर्यादित अनुज्ञेय राहील किंवा | (अ) उपक्रमाने वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ५४०००/- पर्यंत मर्यादित अनुज्ञेय राहील किंवा | (अ) ***प्रशासकीय विभागाने*** वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ५४०००/- पर्यंत मर्यादित अनुज्ञेय राहील किंवा | (अ) ***प्रशासकीय विभागाने*** वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ५४०००/- पर्यंत मर्यादित अनुज्ञेय राहील किंवा | (अ) ***प्रशासकीय विभागाने*** वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ५४०००/- पर्यंत मर्यादित अनुज्ञेय राहील किंवा |
| | | | (ब) अध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) उपक्रमाच्या कामकाजासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ५५००/-देय राहतील किंवा | (ब) अध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) उपक्रमाच्या कामकाजासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ८५००/-देय राहतील किंवा | (ब) अध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) उपक्रमाच्या कामकाजासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ८५००/-देय राहतील किंवा | (ब) अध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** कामकाजासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ५५००/-देय राहतील किंवा | (ब) अध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** कामकाजासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये | (ब) अध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** कामकाजासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ८५००/-देय राहतील किंवा |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | ८५००/-देय राहतील किंवा | |
| | | | (क) वरील (अ) किंवा (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०,००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | (क) वरील (अ) किंवा (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०,००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | (क) वरील (अ) किंवा (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०,००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | (क) वरील (अ) किंवा (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०,००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | (क) वरील (अ) किंवा (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०,००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | (क) वरील (अ) किंवा (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०,००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. |
| | | | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. |
| ५ | **वाहनावर लाल दिवा लावणे** | -- | अनुज्ञेय नाही. | अनुज्ञेय | अनुज्ञेय | अनुज्ञेय नाही | अनुज्ञेय | अनुज्ञेय |
| ६ | **संचालक मंडळाच्या बैठकीनिमित्त अध्यक्षांची राहण्याचीसोय व किरकोळ बाबीप्रित्यर्थ सार्वजनिक** | (अ)मुंबई येथे रु.३००/- प्रतिदिन<br>(ब)नागपूर, औरंगाबाद पुणे, व नाशिक येथे रु.२००/- प्रतिदिन<br>(क)राज्यातील इतर ठिकाणी रु.१५०/- प्रतिदिन | (अ) मुंबई येथे रु.४५०/-प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन | (अ) मुंबई येथे रु.४५०/ -प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन | (अ) मुंबई येथे रु.४५०/ -प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन | (अ) मुंबई येथे रु.४५०/-प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन | (अ) मुंबई येथे रु.४५०/-प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/-प्रतिदिन<br>(क) राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/-प्रतिदिन | (अ) मुंबई येथे रु.४५०/-प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन<br>(क) राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | **उपक्रमाने करावयाचा खर्च** | | (क) राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (क) राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (क) राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (क) राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | | |
| ७ | **प्रवास भत्ता व दैनिक भत्ता** | कार्यालयीन कामासाठी प्रवास करतांना उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवासभत्ता व दैनिक भत्ता हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. तथापि, उपक्रमाच्या संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ च्या धर्तीवर परिगणीत करावेत. | (अ) उपक्रमाच्या कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक/ मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | (अ) उपक्रमाच्या कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक/अधिकारी मुख्य कार्यकारी यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | (अ) उपक्रमाच्या कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक/ मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | (अ) ***समिती/ परिषद/ आयोगाच्या*** कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी ***शासनाच्या उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | (अ) ***समिती/ परिषद/ आयोगाच्या*** कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी ***शासनाच्या सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | (अ) ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी ***शासनाच्या सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. |
| | | | (ब) हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील | (ब) हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील | (ब) हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील | (ब) हे भत्ते ***समिती/ परिषद/आयोगाच्या/*** मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील | (ब) हे भत्ते ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** / मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील | (ब) हे भत्ते ***समिती/ परिषद/आयोगाच्या/*** मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील |
| | | | (क) उपक्रमाच्या संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची आणि/किंवा | (क) उपक्रमाच्या संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची आणि/किंवा | (क) उपक्रमाच्या संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची आणि/किंवा | (क) ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित ***प्रशासकीय विभागाने*** राहण्याची आणि/किंवा | (क) ***समिती /परिषद/आयोगाच्या*** बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित ***प्रशासकीय*** | (क) ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित ***प्रशासकीय विभागाने*** राहण्याची आणि/किंवा जेवणाची |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | ***विभागाने*** राहण्याची आणि/किंवा जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. |
| ८ | **सहाय्यक कर्मचारी वृंद** | कार्यालयीन कामासाठी संबंधित उपक्रमातील व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या एक लघुलेखक अथवा स्वीय सहाय्यक म्हणून काम करण्यासाठी तत्सम कर्मचारी तसेच एक शिपाई याची सेवा उपलब्ध करुन द्यावी. | कार्यालयीन कामासाठी संबंधित उपक्रमातील व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक लघुलेखक अथवा स्वीय सहाय्यक म्हणून काम करण्यासाठी तत्सम कर्मचारी तसेच (२)एक शिपाई याची सेवा उपक्रमाच्या कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | कार्यालयीन कामासाठी संबंधित उपक्रमातील व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि (३)एक शिपाई याची सेवा उपक्रमाच्या कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | कार्यालयीन कामासाठी संबंधित उपक्रमातील व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि(३) एक शिपाई याची सेवा उपक्रमाच्या कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | कार्यालयीन कामासाठी ***शासनातील उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक लघुलेखक अथवा एक स्वीय सहाय्यक म्हणून काम करण्यासाठी तत्सम कर्मचारी तसेच (२) एक शिपाई याची सेवा ***प्रशासकीय विभागाच्या*** कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | कार्यालयीन कामासाठी ***शासनातील सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१) एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि (३)एक शिपाई याची सेवा ***प्रशासकीय विभागाच्या*** कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | कार्यालयीन कामासाठी ***शासनातील सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि (३) एक शिपाई याची सेवा ***प्रशासकीय विभागाच्या*** कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | दौऱ्यातील सुविधा | -- | -- | उपक्रमाच्या कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित उपक्रम करेल. | उपक्रमाच्या कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित उपक्रम करेल. | --- | ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित ***प्रशासकीय विभाग*** करेल. | ***समिती/ परिषद/आयोगाच्या*** कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्या-कडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित ***प्रशासकीय विभाग*** करेल. |
| १० | **निवासस्थान** | --- | उपक्रमांच्या अध्यक्ष यांना उपक्रमाच्या निधीमधून भाडयाने किंवा उपक्रमाच्या स्वत:च्या इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | उपक्रमांच्या अध्यक्ष यांना उपक्रमाच्या निधीमधून भाडयाने किंवा उपक्रमाच्या स्वत:च्या इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | उपक्रमांच्या अध्यक्ष यांना उपक्रमाच्या निधीमधून भाडयाने किंवा उपक्रमाच्या स्वत:च्या इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | ***समिती/परिषद /आयोगाच्या*** अध्यक्ष यांना ***प्रशासकीय विभागाकडून*** भाडयाने किंवा ***शासकीय*** इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | ***समिती/परिषद /आयोगाच्या*** अध्यक्ष यांना ***प्रशासकीय विभागाकडून*** भाडयाने किंवा ***शासकीय*** इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | ***समिती/परिषद /आयोगाच्या*** अध्यक्ष यांना ***प्रशासकीय विभागाकडून*** भाडयाने किंवा ***शासकीय*** इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. |
| ११ | **कार्यालयीन जागा** | ---- | उपक्रमाच्या मुख्यालयामध्ये कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. | उपक्रमाच्या मुख्यालयामध्ये कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. | उपक्रमाच्या मुख्यालयामध्ये कार्यालया- करिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. | ***प्रशासकीय विभागाकडून*** कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. | ***प्रशासकीय विभागाकडून*** कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल | ***प्रशासकीय विभागाकडून*** कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. |
| १२ | शासकीय | -- | -- | शासकीय | शासकीय | -- | शासकीय | शासकीय समारंभाच्या |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | समारंभातील स्थान | | | समारंभाच्या वेळी राज्यमंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. | समारंभाच्या वेळी मंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. | | समारंभाच्या वेळी राज्यमंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. | वेळी मंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. |
| १३ | वाहनावर राष्ट्रध्वज लावणे | -- | -- | लावता येणार नाही. | लावता येणार नाही. | -- | लावता येणार नाही. | लावता येणार नाही. |
| १४ | अंगरक्षक, निवासी पोलीस, दूरध्वनी चालक, एस्कॉर्ट व मानवंदना | -- | -- | अनुज्ञेय नाही. | अनुज्ञेय नाही. | -- | अनुज्ञेय नाही. | अनुज्ञेय नाही. |

## शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक :- शासाउ-१००२/प्र.क्र.६/०२/सा.उ., दिनांक २२ ऑगस्ट, २००३

## जोडपत्र-दोन

| अ. क्र. | राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या उपाध्यक्षांना देय सोयी-सुविधा | | | | | राज्यस्तरीय समित्यांच्या /परिषदांच्या उपाध्यक्षांना देय सोयी सुविधा | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | सध्याच्या सोयी सुविधा | | प्रस्तावित सोयी-सुविधा | | | प्रस्तावित सोयी -सुविधा | | |
| | सोयी-सुविधांचे स्वरुप | शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक १८.१०.१९९१ नुसार देय सोयी-सुविधा | सर्वसाधारण | राज्यमंत्र्यांचा दर्जा प्राप्त अंशकालीन उपाध्यक्ष | मंत्र्यांचा दर्जा प्राप्त अशकालीन उपाध्यक्ष | सर्वसाधारण | राज्यमंत्र्यांचा दर्जा प्राप्त उपाध्यक्ष | मंत्र्यांचा दर्जा प्राप्त उपाध्यक्ष |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | मानधन | देय नाही . | देय नाही . | देय नाही . | देय नाही . | देय नाही . | देय नाही . | देय नाही . |
| २ | संचालक मंडळाच्या बैठकीस उपस्थित राहण्याकरिता बैठक भत्ता | रुपये १५०/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक | रुपये ३००/- प्रति बैठक |
| ३ | निवासी दूरध्वनीवरील खर्च | देय नाही. | देय नाही. | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | देय नाही. | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती | प्रतिमहा रुपये ***३०००/-*** पर्यंतच्या खर्चाची प्रतिपूर्ती |
| ४ | कार्यालयीन कामासाठी वाहन सुविधेवरील खर्च | --- | अनुज्ञेय नाही. | (अ) उपक्रमाने वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष *रुपये* ***५४०००/-*** पर्यंत मर्यादित राहील किंवा | (अ) उपक्रमाने वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ***५४०००/-*** पर्यंत मर्यादित राहील किंवा | अनुज्ञेय नाही. | (अ) ***प्रशासकीय विभागाने*** वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ***५४०००/-*** पर्यंत मर्यादित राहील किंवा | (अ) ***प्रशासकीय विभागाने*** वाहन सुविधा चालकासह उपलब्ध करुन दिल्यास इंधन व तेलावरील खर्च प्रतिवर्ष रुपये ***५४०००/-***पर्यंत मर्यादित राहील किंवा |
| | | | | **(ब)** उपाध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) उपक्रमाच्या कामासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ८५००/- देय राहतील किंवा | **(ब)** उपाध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) उपक्रमाच्या कामासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ८५००/- देय राहतील किंवा | | **(ब)** उपाध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) ***कार्यालयीन*** कामासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ८५००/- देय राहतील किंवा | **(ब)** उपाध्यक्षांना स्वत:चे वाहन (खाजगी वाहन चालकासह) ***कार्यालयीन*** कामासाठी वापरण्यास अनुज्ञेयता असेल यासाठी त्यांना दरमहा रुपये ८५००/- देय राहतील किंवा |
| | | | | (क) वरील (अ) किंवा | (क) वरील (अ) किंवा | | (क) वरील (अ) किंवा (ब) | (क) वरील (अ) किंवा |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | | प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. | (ब) प्रयोज्य नसल्यास, राज्य शासनाने जी वाहने शासकीय कार्यालयासाठी खरेदी करण्यास अनुज्ञेयता दिलेली आहे त्या बनावटीची वाहने निविदा पध्दतीने दर मागवून त्या दराने द.सा. १०००० कि.मी. च्या प्रवासाच्या मर्यादेत भाडयाने घेता येतील. |
| | | | | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. | (ड) वरील पर्यायापैकी एका वर्षी एकच पर्याय अनुज्ञेय राहील. कोणत्याही परिस्थितीत त्यात बदल होणार नाही. |
| ५ | वाहनावर लाल दिवा लावणे | -- | अनुज्ञेय नाही. | अनुज्ञेय | अनुज्ञेय | अनुज्ञेय नाही | अनुज्ञेय | अनुज्ञेय |
| ६ | संचालक मंडळाच्या बैठकीनिमित्त राहण्याची सोय व किरकोळ बाबी प्रित्यर्थ सार्वजनिक उपक्रमाने करावयाचा खर्च | (अ)मुंबई येथे रु.३००/- प्रतिदिन (ब)नागपूर, औरंगाबाद पुणे, व नाशिक येथे रु.२००/- प्रतिदिन (क)राज्यातील इतर ठिकाणी रु.१५०/- प्रतिदिन | (अ)मुंबई येथे रु.४५०/- प्रतिदिन (ब)नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन (क)राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (अ)मुंबई येथे रु.४५०/ -प्रतिदिन (ब)नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन (क)राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (अ)मुंबई येथे रु.४५०/ -प्रतिदिन (ब)नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन (क)राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (अ)मुंबई येथे रु.४५०/-प्रतिदिन (ब)नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन (क)राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (अ)मुंबई येथे रु.४५०/-प्रतिदिन (ब)नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन (क)राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन | (अ)मुंबई येथे रु.४५०/- प्रतिदिन (ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रु.३००/- प्रतिदिन (क)राज्यातील इतर ठिकाणी रु.२२५/- प्रतिदिन |
| ७ | प्रवास भत्ता व दैनिक भत्ता | कार्यालयीन कामासाठी | (अ)उपक्रमाच्या | (अ)उपक्रमाच्या | (अ)उपक्रमाच्या | (अ) ***समिती/*** | (अ) ***समिती/*** | (अ) ***समिती/*** |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रवास करतांना उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवासभत्ता व दैनिक भत्ता हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. तथापि, उपक्रमाच्या संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन अध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ च्या धर्तीवर परिगणीत करावेत. | कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त प्रवासासाठी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | ***परिषद/ आयोगाच्या*** कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त ***शासनाच्या उप सचिव दर्जाच्या अधिकारी*** यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | ***परिषद/आयोगाच्या*** कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त ***शासनाच्या सचिव दर्जाचा अधिकारी*** यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. | ***परिषद/आयोगाच्या*** कामासाठी अनुज्ञेय वाहन सुविधेव्यतिरिक्त ***शासनाच्या सचिव दर्जाचा अधिकारी*** यांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. |
| | | | (ब) हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. | (ब) हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. | (ब) हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. | (ब) हे भत्ते ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. | (ब) हे भत्ते ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. | (ब) हे भत्ते ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. |
| | | | (क) उपक्रमाच्या | (क) उपक्रमाच्या | (क) उपक्रमाच्या संचालक | (क) ***समिती/ परिषद/*** | (क) ***समिती/परिषद/*** | (क) ***समिती/परिषद/*** |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| --- | --- | --- | --- | --- | --- | --- | --- | --- |
| | | | संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन उपाध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन उपाध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन उपाध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | ***आयोगाच्या*** मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित ***प्रशासकीय विभागाने*** राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन उपाध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | ***आयोगाच्या*** मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित ***प्रशासकीय विभागाने*** राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन उपाध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. | ***आयोगाच्या*** मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील अनुक्रमांक (६) अनुसार संबंधित ***प्रशासकीय विभागाने*** राहण्याची/ जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर अंशकालीन उपाध्यक्षांना देय दैनिक भत्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणित होतील. |
| ८ | सहाय्यक कर्मचारी वृंद | कार्यालयीन कामासाठी संबंधित उपक्रमातील व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या एक लघुलेखक अथवा स्वीय सहाय्यक म्हणून काम करण्यासाठी तत्सम कर्मचारी तसेच एक शिपाई याची सेवा उपलब्ध करुन द्यावी. | | कार्यालयीन कामासाठी संबंधित उपक्रमातील व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१) एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि (३) एक शिपाई याची सेवा उपक्रमाच्या कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | कार्यालयीन कामासाठी संबंधित उपक्रमातील व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि (३) एक शिपाई याची सेवा उपक्रमाच्या कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | | ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** कामासाठी ***शासनातील उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि (३) एक शिपाई याची सेवा ***प्रशासकीय विभागाच्या*** कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. | ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** कामासाठी ***शासनातील उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यास*** अनुज्ञेय असलेल्या दर्जाचा (१)एक स्वीय सहाय्यक, (२) एक लिपिक आणि (३) एक शिपाई याची सेवा ***प्रशासकीय विभागाच्या*** कर्मचाऱ्यांमधून उपलब्ध करुन द्यावी. |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ९ | दौऱ्यातील सुविधा | -- | | उपक्रमाच्या कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित उपक्रम करेल. | उपक्रमाच्या कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित उपक्रम करेल. | | ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित उपक्रम करेल. | ***कार्यालयीन समिती/परिषद/ आयोगाच्या*** कामाकरिता दौऱ्यावर असल्यास शासकीय विश्रामगृह येथे निवासाची व्यवस्था अनुज्ञेय राहील व उपलब्धतेनुसार डी.व्ही. वाहन पुरविण्यात येईल. डी.व्ही. वाहन उपलब्ध नसल्यास इतर शासकीय वाहन जिल्हाधिकाऱ्यांकडून पुरविले जाईल. सदर निवास व परिवहन व्यवस्थेबाबतच्या देयकाची प्रतिपूर्ती संबंधित उपक्रम करेल. |
| १० | निवासस्थान | --- | | उपक्रमांच्या उपाध्यक्ष यांना उपक्रमाच्या निधीमधून भाडयाने किंवा उपक्रमाच्या स्वत:च्या इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | उपक्रमांच्या उपाध्यक्ष यांना उपक्रमाच्या निधीमधून भाडयाने किंवा उपक्रमाच्या स्वत:च्या इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | | ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** उपाध्यक्ष यांना भाडयाने किंवा ***शासकीय*** इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. | ***समिती/ मंडळाच्या*** उपाध्यक्ष यांना ***समिती मंडळाच्या तरतूदीमधून*** भाडयाने किंवा ***शासकीय*** इमारतीमध्ये निवासस्थान उपलब्ध करुन देण्यात येऊ नये. |
| ११ | कार्यालयीन जागा | ---- | | उपक्रमाच्या मुख्यालयामध्ये कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल | उपक्रमाच्या मुख्यालयामध्ये कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. | | ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** मुख्यालयामध्ये कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल. | ***समिती/परिषद/ आयोगाच्या*** मुख्यालयामध्ये कार्यालयाकरिता जागा उपलब्ध करुन देण्यात येईल |

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १२ | शासकीय समारंभातील स्थान | -- | | शासकीय समारंभाच्या वेळी राज्यमंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. | शासकीय समारंभाच्या वेळी मंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. | | शासकीय समारंभाच्या वेळी राज्यमंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. | शासकीय समारंभाच्या वेळी मंत्र्यांच्या नंतरचे स्थान राहील. |
| १३ | वाहनावर राष्ट्रध्वज लावणे | -- | | लावता येणार नाही. | लावता येणार नाही. | | लावता येणार नाही. | लावता येणार नाही. |
| १४ | अंगरक्षक, निवासी पोलीस, दूरध्वनी चालक, एस्कॉर्ट व मानवंदना | -- | | अनुज्ञेय नाही | अनुज्ञेय नाही | | अनुज्ञेय नाही. | अनुज्ञेय नाही. |

**शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक :- शासाउ-१००२/प्र.क्र.६/०२/सा.उ., दिनांक २२ ऑगस्ट, २००३**

**जोडपत्र- तीन**

**सार्वजनिक उपक्रमांच्या संचालक मंडळाच्या सदस्यांना देय सोयी-सुविधा**

| अ.क्र. | सोयी-सुविधांचे स्वरुप | शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक १८.१०.१९९१ नुसार सोयी-सुविधा | प्रस्तावित सोयी-सुविधा |
|---|---|---|---|
| १ | **संचालक मंडळाच्या बैठकीस उपस्थित राहण्यासाठी प्रति बैठक फी** | रुपये १५०/-प्रति बैठक प्रतिदिन | रुपये ३००/- प्रति बैठक प्रतिदिन |
| २ | **संचालक मंडळाच्या बैठकीनिमित्त संचालक मंडळाच्या सदस्यांची राहण्याची सोय व किरकोळ बाबीप्रित्यर्थ उपक्रमास खालील मर्यादेपर्यंत खर्च करता येईल.** | (अं) मुंबई येथे रुपये ३००/- प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रुपये २००/- प्रतिदिन<br>(क) राज्यातील इतर ठिकाणी रुपये १५०/- प्रतिदिन | (अं) मुंबई येथे रुपये ४५०/- प्रतिदिन<br>(ब) नागपूर, औरंगाबाद, पुणे व नाशिक येथे रुपये ३००/- प्रतिदिन<br>(क) राज्यातील इतर ठिकाणी रुपये २२५/- प्रतिदिन |
| ३ | **प्रवास भत्ता व दैनिक भत्ता** | कार्यालयीन कामासाठी प्रवास करतांना उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवासभत्ता व दैनिक भत्ता हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. तथापि, उपक्रमाच्या संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील (५) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची/जेवणाची सोय पुरवली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर संचालक मंडळाच्या सदस्यांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/ १५६ /सी/ एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ च्या धर्तीवर परिगणीत करावेत. | (अ) उपक्रमाच्या कामाप्रित्यर्थ प्रवासासाठी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालकांना अनुज्ञेय असलेल्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. |
| | | | (ब) हे भत्ते संचालक मंडळाच्या बैठकीचा दिवस तसेच त्या बैठकीसाठी केलेल्या प्रवासापुरतेच मर्यादित राहतील. |
| | | | (क) उपक्रमाच्या संचालक मंडळाच्या बैठकीस हजर राहण्याप्रित्यर्थ वरील (२) अनुसार संबंधित उपक्रमाने राहण्याची/जेवणाची सोय पुरविली असेल अथवा त्यासाठी खर्च केला असेल तर संचालक मंडळाच्या सदस्यांना देय दैनिक भत्त्याचे दर हे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: टीआरए १०७७/१५६/सी/एसईआर-५, दिनांक ११.८.१९७७ च्या परि.१३ प्रमाणे परिगणीत होतील. |